**"पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी-०३.१८/प्र.क्र. १०९/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६ ऑक्टोंबर, २०१८

**वाचावे :-**

१. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-३/योजनेतर/प्र.क्र.७/१७-१८/२१९९, दिनांक :- २६.०२.२०१८.
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दिनांक :- ०५.०३.२०१८.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३.१८ /प्र.क्र.१०९/फ-१, दिनांक :- २७.०३.२०१८.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:- पदनि- २०१६/ प्र.क्र.०८/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८.

**शासन निर्णय :-**

"पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याचा अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये सादर केला आहे. **वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयानुसार** प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार "पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांना संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ मध्ये दिनांक **०१.०३.२०१८ ते दिनांक ३०.०९.२०१८ पर्यत** मुदत वाढ देण्यात आली आहे.

आता **संदर्भ क्रमांक ४ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये** सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यंत** मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले आहेत.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक १ च्या पत्रान्वये "पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण

करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांना सन २०१८-१९ मध्ये दिनांक ०१.०३.२०१ ८ ते दिनांक २८.०२.२०१९ पर्यत चालू ठेवण्याकरीता सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन **वित्त विभागाच्या संदर्भ ४ च्या शासन निर्णयान्वये** प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये "पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांना **दिनांक ०१.१०.२०१८ ते दिनांक २८.०२.२०१९** पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. "पेंच व्याघ्र प्रकल्पाची स्थापना" या योजनेत्तर योजनेखाली निर्माण करण्यात आलेल्या ४२ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ - वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) ०१-वनीकरण, १०१ वनसंधारण व विकास, १०१(०१) प्रशासन व संरक्षण, (०१) (०१) प्रशासन व संरक्षण ०१-वेतन (२४०६ ००९६) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व क्रमांक:- पदनि २०१६/ प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दिनांक :- ०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००६१५५५१४८७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2018.10.06 15:54:08 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , पुर्व नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.१८/प्र.क्र.१०९/फ-१,**
**दिनांक :- ०६ ऑक्टोंबर, २०१८ सोबतचे विवरणपत्र.**
**(दिनांक :- ०१.१०.२०१८ ते दिनांक :- २८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदे |
|---|---|---|
| १ | वनसंरक्षक आणि क्षेत्रसंचालक | १ |
| २ | विभागीय वन अधिकारी | १ |
| ३ | सहा. वनसंरक्षक | १ |
| ४ | वनक्षेत्रपाल | १ |
| ५ | कार्यालय अधीक्षक | १ |
| ६ | वनपाल | ३ |
| ७ | वनरक्षक | १८ |
| ८ | मुख्य लेखापाल | १ |
| ९ | लेखापाल | १ |
| १० | लिपिक नि टंकलेखक | ५ |
| ११ | शिपाई | २ |
| १२ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ |
| १३ | वाहनचालक | २ |
| १४ | चौकीदार | १ |
| १५ | वायरलेस हेल्पर | २ |
| १६ | मास्ट लष्कर | १ |
| | **एकूण अस्थायी पदे** | **४२** |

********